# श्रीमती ग्रिंडलेचे बूट

**जॉय**



# श्रीमती ग्रिंडलेचे बूट

मराठी : गार्गी लागू



श्रीमती ग्रिंडले यांना त्यांच्या जुन्या बूटांचा खूप कंटाळा आला होता. म्हणून ती एका दुकानात बूट खरेदी करण्यासाठी गेली.

"तुम्ही अगदी योग्य दुकानात आला अहात," दुकानातील विक्रेती म्हणाली.

"मी तुम्मच्या पसंतीचे बूट नक्की शोधून काढु शकेन,"
"खूप छान!" श्रीमती ग्रिंडले म्हणाली.



"तुम्हाला हे लाल रंगाचे बूट कसे वाटले?
तुम्हाला शोभून दिसतील."

"मला लाल रंग आवडत नाही," श्रीमती ग्रिंडले म्हणाली.



"बर, मग हे निळ्या रंगाचे बूट बघा.....तुम्हाला नक्की आवडतील."

"निळा रंग माझा नावडता आहे," श्रीमती ग्रिंडले म्हणाली.



"बर, मग हे नविन डिझाईनचे बूट बघा....याला पुढचा पंजाचा भाग आणि उंच टाच नाही आहे. सध्या या प्रकारचे बूट पसंत केले जातात."

"नको, नको, हे बूट घालून माझ्या पायांना थंडी वाजेल," श्रीमती ग्रिंडले म्हणाली.

"अरे, तुम्हाला पायांना थंडी वाजत असेल तर तुम्ही हे फर लावलेले बूट सर्वात चांगले," विक्रेती म्हणाली.

"मला फरवाले बूट आवडत नाहीत," श्रीमती ग्रिंडले म्हणाली.



"मग हे उंच टाचांचे बूट," विक्रेतीने विचारले.

"नाही, याची टाच खूपच उंच आहे," श्रीमती ग्रिंडले सांगती झाली.

"मग सपाट तळ असलेले....." विक्रेतीने विचारले

"नाही, हे तर एकदम सपाट आहेत...."श्रीमती ग्रिंडले म्हणाली.

विक्रेती बर्याच वेगवेगळ्या प्रकारचे बूट दाखवित राहिली. आणि श्रीमती ग्रिंडले ते घालून बघत होती.

थोड्या वेळात पूर्ण दुकान बूटांनी भरून गेले. दुकानात सगळीकडे बूटच बूट पसरले.



शेवटी श्रीमती ग्रिंडले यांना बूटांचा एक जोड पसंत पडला.

"हे माझ्या आवडीचे बूट आहेत,
याचा रंग माझा आवडता आहे,
याचा आकारही छान आहे,
हे घातल्यावर मला खूप छान वाटत आहे,
मी हेच बूट विकत घेते !......"



"अरे, श्रीमती ग्रिंडले!

विक्रेतीने हात कपाळावर मारून

हताशपणे म्हटलं,

"हे तर तुमचेच जुने बूट आहेत,

जे घालून तुम्ही दुकानात आला होता...."



**समाप्त**